**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, सलसाडी, ता.तळोदा, जि.नंदुरबार येथील इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.६७/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३ फेब्रुवारी, २०१०.

<u>वाचा</u> :- आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.इमा-०९/(प्र.क्र.०७/का.८(३), दि.१२.१.२०१०.

**<u>शासन निर्णय</u>** : प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, सलसाडी, ता.तळोदा, जि.नंदुरबार येथील इमारत दुरुस्तीबाबतची रु.५,४४,४४३/, रु.४,१९,३७२/- व रु.४,०५,२०३/- इतक्या रकमेची तीन अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करण्यात आली आहेत.

२. सदर अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केली असून उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, तळोदा यांनी तपासली आहेत. तसेच प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा, मुख्याध्यापक, शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळा, सलसाडी, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, तळोदा व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदुरबार यांनी साक्षांकित केली आहेत.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहे.

४. सदर कामे दुरुस्तीची असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,तळोदा यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या इमारत दुरुस्तीच्या तीन अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट केलेले ५% सेंटेज चार्जेस व ४% आकस्मिक खर्च वगळून अंदाजपत्रकांना खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | दुरुस्तीची बाब | अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | आश्रमशाळा आवारातील दोन शेडस्ची दुरुस्ती | रु.४,९९,४८९/- |
| २ | आश्रमशाळा आवारातील दोन शेडस्ची दुरुस्ती | रु.३,८४,७४५/- |
| ३ | स्वच्छतागृह, स्वयंपाकघर व वर्गखोली दुरुस्ती | रु.३,७१,७४६/- |
| | | **रु.१२,५५,९८०/-** |

५. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे.

६. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००२०३२०१४१२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदुरबार.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, तळोदा.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.